शासकीय दूध योजनेतंर्गत होणाऱ्या दूधाच्या
विक्री कमीशन दरात बदल करून दूधाच्या
विक्री दरात सुधारणा करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके-२०२०/प्र.क्र.१२० /पदुम-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ नोव्हेंबर, २०२१

वाचा : १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. एमएलके-००९/१०३७५/प्र.क्र.७१/ पदुम-८, दि.१३.८.२००९
२) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय समक्रमांकीत दि.०७.१०.२०२०
३) कृषि व पदुम विभाग शासन शुध्दीपत्रक समक्रमांकीत दि.१२.१०.२०२०
४) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास कार्यालयाचे दि.७.१०.२०२१ रोजीचे पत्र.
५) प्रदत्त समितीच्या दि.११.११.२०२१ रोजी झालेली बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

शासनाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शासकीय दूध योजनेतंर्गत खरेदी व विक्री करण्यात येणाऱ्या दूधाचे दर निर्धारीत करून निर्णय घेण्यासाठी सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली प्रदत्त समितीची स्थापना करण्यात आलेली आहेे. संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर समितीची बैठक दि.११.११.२०२१ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत "आरे शक्ती" गाय दूध विक्री दरात व "आरे भुषण टोण्ड" दूध विक्री दरात सुधारणा करणे, गाय टोण्ड दूध (३.५/८.५) व फुल क्रीम दूध (६.०/९.०) या दूधाच्या विक्री दरात सुधारणा करणे तसेच शासकीय दूध योजनेतंर्गत वितरकांना देण्यात येणारे दूध कमीशन दरात सुधारणा करण्याचा प्रस्ताव विचारात घेण्यात आला.

प्रदत्त समितीने सदर बैठकीत घेतलेल्या निणर्यानुसार "आरे शक्ती" गाय दूध विक्री दरात व "आरे भुषण टोण्ड" दूध विक्री दरात सुधारणा करणे, गाय टोण्ड दूध (३.५/८.५) व फुल क्रीम दूध (६.०/९.०) या दूधाच्या विक्री दरात सुधारणा करणे तसेच शासकीय दूध योजनेतंर्गत वितरकांना देण्यात येणारे दूध कमीशन दरात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

शासन या निर्णयान्वये शासकीय दूध योजनेमार्फत विक्री करण्यात येणाऱ्या "आरे भूषण" टोण्ड दूध, गाय टोण्ड दूध, "आरे शक्ती" गाय दूध व फुल क्रीम दूधाच्या विक्री दरामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास मान्यता देत असून , सदर निर्णय दि.०१/१२/२०२१ पासून अंमलबजावणीत येतील.

| अ.क्र. | दूधाचा प्रकार | पूर्वीचे विक्री दर | | सुधारीत विक्री दर | |
|---|---|---|---|---|---|
| | | १ लिटर | १/२ लिटर | १ लिटर | १/२ लिटर |
| १. | आरे भूषण टोण्ड दूध | ३८ | १९ | ३९ | २० |
| २. | गाय टोण्ड दूध | ३८ | १९ | ३९ | २० |
| ३ | आरे शक्ती गाय दूध | ४२ | २२ | ४३ | २३ |
| ४. | फुल क्रीम दूध | ४७ | २४ | ४८ | २५ |

तसेच वितरक कमीशन सरसकट रू.४/- असे करण्यात येत आहे.

रूग्णालये व संस्था या ठोक ग्राहकांकरीता वाहतूक खर्च व स्थळ पोहोच आकार प्रतिलिटर अनुक्रमे रू.१.५० व रू.०.७५ असा एकूण रू.२.२५ करण्यात येत आहे. सदर दर रूग्णालये, संस्था या ठोक ग्राहकांमार्फत परस्पर अदा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११२६१३१८१९३००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Marale Niwrutti Bhaguji

Digitally signed by Marale Niwrutti Bhaguji
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, pseudonym=85DEC352A563C6C48CE612C5F1F3DBE440A34530, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=Marale Niwrutti Bhaguji
Date: 2021.11.26 13:20:06 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२.मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३.मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय)/ मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
५.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६.अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
९.आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य,
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., (महानंद), मुंबई
११. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे/नागपूर/मुंबई/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
१२. महालेखापाल १/२ महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१५. निवडनस्ती.